**मा. लोकायुक्त यांचेकडील प्रकरण**

**श्री.मोहम्मद लियाकत अली अन्सारी यांनी जिल्हा परिषद उर्दू प्राथमिक शाळा, रोजे खुर्द, ता. कंधार, जि नांदेड या शाळेकरीता भाडेतत्वावर दिलेल्या खाजगी जागेचे थकित भाडे अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-लोआप्र-२०२०/प्र.क्र.१५२/एसएम-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:-१५ डिसेंबर, २०२१

वाचा :- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. पीआई-१०९४/७०४(दोन)/प्राशि-१, दिनांक १४ नोव्हेंबर, १९९४.

(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/ एसएम-४, दिनांक ०४ जून, २०२०.

(३) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.उमाशा-२०२०/प्र.क्र.१३/ एसएम-४, दिनांक २९ नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्राथमिक शाळासाठी भौतिक, शैक्षणिक सुविधा व दैनंदिन उपयोगाचे साहित्य उपलब्ध करण्यासाठी मागील वर्षाच्या वेतन खर्चाच्या ४ टक्केपर्यंत सादिलवार खर्च करण्यास संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सादिलवार खर्च करावयाच्या अनुज्ञेय बाबींच्या यादीमध्ये संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे.

२. श्री.मोहम्मद लियाकत अली अन्सारी यांनी जिल्हा परिषद उर्दू प्राथमिक शाळा, रोजे खुर्द, ता. कंधार, जि नांदेड या शाळेकरीता भाडेतत्वावर दिलेल्या जागेचे भाडे थकित असल्याची तक्रार मा. लोकायुक्तांकडे केली आहे. मा. लोकायुक्तांनी या प्रकरणावर झालेल्या सुनावणीच्या वेळी राज्यातील अन्य जिल्हा परिषदांनी प्राथमिक शाळांकरीता घेतलेल्या खाजगी इमारतीच्या/ जागांचे थकित भाड्याची रक्कम अदा करण्याबाबत धोरण निश्चित करण्याचे निर्देश शासनास दिले आहेत. मा. लोकआयुक्त यांनी दिलेल्या निर्देशास अनुसरुन भाडयाच्या इमारतीत सुरु असलेल्या जिल्हा परिषद प्राथमिक शाळांच्या भाडे अदायगीबाबत धोरण ठरविण्यासंदर्भात मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.११ नोव्हेंबर, २०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीच्या संदर्भ क्र.(३) येथील इतिवृत्तानुसार, संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये सादिलवार अनुदानातून खर्च भागविण्यासाठी अनुज्ञेय करण्यात आलेल्या वस्तु/बाबींच्या यादीमध्ये अ.क्र.(१०)

येथे "जिल्हा परिषदेने प्राथमिक शाळांसाठी घेतलेल्या खाजगी इमारती/ जागांच्या भाड्याची रक्कम" ही बाब नव्याने समाविष्ट करण्यात आली आहे. मा. मुख्य सचिव यांच्या बैठकीतील निर्णय विचारात घेता श्री. मोहम्मद लियाकत अली अन्सारी यांनी जिल्हा परिषद उर्दू प्राथमिक शाळा, रोजे खुर्द, ता. कंधार, जि नांदेड या शाळेकरीता भाडेतत्वावर दिलेल्या जागेचे थकित भाडे अदा करणेची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णय, दिनांक २९ जानेवारी, २०२१ मधील सुधारीत तरतूदीनुसार श्री. मोहम्मद लियाकत अली अन्सारी यांनी जिल्हा परिषद उर्दू प्राथमिक शाळा, रोजे खुर्द, ता. कंधार, जि नांदेड या शाळेकरीता भाडेतत्वावर दिलेल्या जागेचे थकित भाडे रु.१५,२१,२८०/- ( रुपये पंधरा लाख एकवीस हजार दोनशे ऐंशी फक्त ) इतका निधी संबंधितांना मंजूर व अदा करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या सुपूर्द करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम आहरित करण्यासाठी शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. नांदेड यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. नांदेड यांनी श्री. मोहम्मद लियाकत अली अन्सारी यांना थकीत भाड्याची रक्कम तात्काळ अदा करावी व केलेली कार्यवाही शासनास अवगत करावी.

३. उपरोक्त बाबीवर होणारा खर्च "मागणी क्र. ई-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण-०१-प्राथमिक शिक्षण १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (२२०२-०१७३) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०९८/२०२१/व्यय-५, दिनांक ०६.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२१५१५३५१२३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.12.15 15:36:16 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव

२) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) जिल्हाधिकारी, नांदेड
७) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. नांदेड
९) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक ), जिल्हा परिषद, नांदेड
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
१५) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१६) मोहम्मद लियाकत अली अन्सारी,रा.छोट्टी गल्ली,कंधार ता.कंधार जि.नांदेड
१७) निवड नस्ती, एसएम-४.